अग्निशमन आपत्कालिन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान योजनेंतर्गत निधी मंजूर करण्याबाबत.

**सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक :- अशसे-२०२१/प्र.क्र.९९/नवि-०४

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: - २५ फेब्रुवारी,२०२२

संदर्भ :-

१) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशस-४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९.
२) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२७/नवि-२०, दिनांक १२ ऑगस्ट,२०१६.
३) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशसे-२०१९/प्र.क्र.६१/नवि-०४,दिनांक १२ मार्च,२०२१.
४) महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे-२०२१/३२-क/१२६६, दि. १५ नोव्हेंबर,२०२१.

प्रस्तावना :-

राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरून काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने दि.३१.०८.२००९ रोजी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नव्याने स्थापन झालेल्या ड-वर्ग महानगरपालिका,नगरपरिषदा व नगरपंचायती यांचा समावेश महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानात करण्यात आला आहे. संदर्भ क्र.१ येथील दिनांक ३१.०८.२००९ च्या शासन निर्णयानुसार अग्नीशमन केंद्राच्या प्रकारानुसार अग्नीशमन केंद्र बांधकामासाठी अनुज्ञेय खर्च व अनुज्ञेय खर्चाच्या मर्यादा निश्चित करण्यात आल्या होत्या. संदर्भ क्र.३ येथील दिनांक १२ मार्च,२०२१ च्या शासन निर्णयान्वये सदर अनुज्ञेय खर्चाच्या मर्यादेत व वित्तीय आकृतीबंधात सुधारणा करुन महाराष्ट्र

अग्निसुरक्षा अभियानांतर्गत अग्नीशमन केंद्र बांधकाम व अग्नीशमन वाहन खरेदीसाठी अनुज्ञेय खर्च मर्यादा नव्याने निश्चित करण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र. (४) अन्वये संचालक,महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, यांनी शिफारस केल्यानुसार सांगली महानगरपालिका यांचा महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत समावेश करून त्यांच्या शासन हिश्श्याची रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांनी संदर्भ क्र.४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत **सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेचा** महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानाअंतर्गत समावेश करून, २ अग्निशमन केंद्र बांधकाम व ४ अग्निशमन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

०२. **सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेस** २ अग्निशमन केंद्र बांधकाम व ४ अग्निशमन वाहन खरेदीसाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे रुपये रु. ४,९५,००,०००/- इतका निधी मंजुर करण्यात येत असुन यातील शासन हिश्याचे (७०%) रु.३,४६,५०,०००/- पैकी रु. **२,५०,००,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी,पन्नास लाख मात्र)** इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**०३.** ४ अग्निशमन वाहनाकरीता व २ अग्निशमन केंद्राच्या इमारतीचे बांधकामाकरीता **रू.३,४६,५०,०००/- (रूपये तीन कोटी,शेहेचाळीस लाख,पन्नास हजार मात्र)** इतक्या रक्कमेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

**अ)** सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना शासन निर्णय ,सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.बीडीजी २०१४/प्र.क्र.९६/इमा.३, दि.८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**ब)** काम सुरू करण्यापूर्वी अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग व प्रशासकीय विभागाने सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करून घ्यावे.

**क)** काम सूरू करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सूरू करावे.

**ड)** ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक/दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

**इ)** प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानूसार कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानामध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेकरीता २ अग्निशमन केंद्र व ४ अग्निशमन वाहन याकरिता एकूण रू.४.९५ कोटी इतका खर्च मंजुर करण्यात येत आहे. त्यापैकी शासन हिश्याची (७०%) रू. ३,४६,५०,०००/- इतक्या रक्कमेपैकी **२,५०,००,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी,पन्नास लाख मात्र)** इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर रकमेतून प्रथम अग्निशमन वाहने खरेदी करण्यात यावी तद्नंतर दोन्ही अग्निशमन केंद्राचे बांधकाम हाती घेण्यात यावे. सदर वितरीत निधी खर्च केल्यानंतर शासन हिश्याच्या उर्वरीत रु.९६,५०,०००/- निधी वितरणाचा प्रस्ताव पुर्वीच्या वितरीत निधीच्या उपयोगीता प्रमाणपत्रासह शासनास सादर करावा. शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात महानगरपालिका हिश्याची (३०%) रक्कम महानगरपालिकेने अदा करावी. 1xFS-II प्रकारच्या अग्निशमन केंद्रासाठी रु. ३,०१,१५,२००/- व 1xFS-III प्रकारच्या अग्निशमन केंद्रासाठी रु. १,४८,३९,५००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक शहर अभियंता, सांगली महानगरपालिका यांनी प्रमाणीत करुन सादर केलेले आहे. २ अग्निशमन केंद्र व ४ अग्निशमन वाहन याकरिता मंजुर वित्तीय आकृतीबंधा व्यतिरिक्त वाढीव खर्च महानगरपालिकेने स्वनिधीतुन भागवावा.**वाढीव खर्चासाठी शासन स्तरावरुन कोणतेही वाढीव अनुदान मंजुर करण्यात येणार नाही.**

**०५.** सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्निमशन सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करुन संबधीत मुख्याधिकारी,यांना वितरित करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा

**०६.** सदर कामासाठी येणारा खर्च "एफ-२, २२१७, नगर विकास, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००)(७०) राज्यातील महानगरपालिकांना अग्निशमन सेवा व आणीबाणीच्या सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी सहाय्य (२२१७ ८११९) ३१, सहाय्यक अनुदान (वेनतेतर)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या सन २०२१-२२ च्या मंजूर अनुदानमधून भागविण्यात यावा.

**०७.** सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार विनियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-

पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

०८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर,२०२१ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२२०२२५१३००१४४०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad
Gyanoba
Kirwale

Digitally signed by Sharad Gyanoba Kirwale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ed23302d612eecfa1f6e35cc7ef096ce9dc6a6c617b767e8f74743b779e2b96, serialNumber=c631899d874203cfe881c8e1591d8fbaa6668e6f09ef06648708b4b914985e5c, cn=Sharad Gyanoba Kirwale
Date: 2022.02.25 14:35:47 +05'30'

( शरद किरवले )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
११) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई

१२) संचालक, महाराष्ट्र अग्निमशन सेवा संचालनालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त,सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांना वितरित करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

१३) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई.

१४) आयुक्त,सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका

१५) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अथसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१६) निवडनस्ती, (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(शासन निर्णय क्र. अशासे-२०२१/प्र.क्र.९९/नवि-०४,दिनांक २५ फेब्रुवारी,२०२२ चे सहपत्र)

विवरणपत्र

**सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका**

(रक्कम रु.कोटी)

| अग्नीशमन केंद्र/वाहन | तपशील | एकुण | मनपा हिस्सा (३०%) | शासन हिस्सा (७०%) | प्रस्तुत शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेले शासन हिश्याचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| ४ अग्नीशमन वाहने | ४ x रु.५५लाख | २.२० | ०.६६ | १.५४ | १.५४ |
| २ अग्नीशमन केंद्र | 1xFS-II | १.५० | ०.४५ | १.०५ | ०.९६ |
| | 1xFS-III | १.२५ | ०.३७५ | ०.८७५ | |
| **एकुण** | | **४.९५** | **१.४८५** | **३.४६५** | **२.५०** |

Sharad Gyanoba Kirwale

Digitally signed by Sharad Gyanoba Kirwale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ed23302d612eecfa1f6e35cc7ef096ce9dc6a6c617b767e8f74743b779e2b96, serialNumber=c631899d874203cfe881c8e1591d8fbaa6668e6f09ef06648708b4b914985e5c, cn=Sharad Gyanoba Kirwale
Date: 2022.02.25 14:35:02 +05'30'

(शरद किरवले)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन